सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८
महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या उमेदवारांचे मंत्रालयीन प्रशासकीय विभागात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,**
**शासन ज्ञापन क्रमांक : एएससी १४१९/प्र.क्र. ६५/१४-अ,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २६ नोव्हेंबर, २०२१**

वाचा :- १) समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक १७ मे, २०१९
२) समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक २५ ऑक्टोबर, २०१९
३) समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक ३ फेब्रुवारी, २०२०
४) महाराष्ट्र लोकसेवा आयोग पत्र क्रमांक १४४२ (२) (२)/२०१८/२३, दि. ११.११.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग, शा.परिपत्रक क्र. मलोआ २०१७/प्र.क्र.१२६/१४-अ, दिनांक २१-०८-२०१७

ज्ञापन :-

गट-ब (अराजपत्रित) मधील सहायक कक्ष अधिकारी या पदावर नियुक्ती करण्यासाठी घेण्यात आलेल्या सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक ४.४.२०१९ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या उमेदवारांचे संदर्भाधिन क्र. १ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले होते. सदर ज्ञापनातील रुजू न झालेल्या उमेदवारांच्याऐवजी संदर्भाधिन क्र. ५ येथील शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे दिनांक ०९-०८-२०१९ च्या पत्रान्वये प्रतिक्षा यादीतील उमेदवार उपलब्ध करुन देण्याची मागणी करण्यात आली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १७-०९-२०१९ च्या पत्रान्वये रूजू न झालेल्या प्रवर्गातील आरक्षित जागांसाठी प्रतिक्षायादीतील उमेदवार उपलब्ध करुन दिले होते. सदरहू प्रतिक्षायादीतील उमेदवारांचे संदर्भाधिन क्र. २ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभाग व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले. संदर्भाधिन क्र. २ येथील ज्ञापनान्वये प्रतिक्षायादीतून नियतवाटप केलेले तथापि रुजू न झालेले उमेदवार, मूळ यादीतील रुजू होऊन सेवा सोडून गेलेल्या उमेदवारांऐवजी दिनांक ११-१२-२०१९ च्या पत्रान्वये प्रतिक्षायादीतील पुढील उमेदवार उपलब्ध करुन देण्याची मागणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे करण्यात आली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १६-०१-२०२० च्या पत्रान्वये प्रतिक्षायादीतील उमेदवारांची दुसऱ्यावेळी शिफारस केली. सदरहू प्रतिक्षायादीतील उमेदवारांचे संदर्भाधिन क्र. ३ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या व या विभागाकडून नियतवाटप करण्यात आलेल्या १६ उमेदवारांपैकी ३ उमेदवारांची खुला (सर्वसाधारण) या प्रवर्गातून आयोगाने शिफारस केली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने खुला (सर्वसाधारण) या प्रवर्गातून शिफारस केलेल्या ३ उमेदवारांपैकी १ उमेदवार श्री.सुरज सुरेश बेलेकर या उमेदवारांने वित्त विभागातील नियुक्ती स्विकारली नाही.

दरम्यान श्री.संग्राम शिवाजी पाटील यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्रमांक १०/२०२० दाखल केला दाखल केली. मा. न्यायाधिकरणाने दिनांक २४ सप्टेंबर २०२१ रोजी सदर याचिकेवर अंतिम आदेश दिले आहेत. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने श्री. संग्राम शिवाजी पाटील यांची सहायक कक्ष अधिकारी या पदासाठी खुल्या (सर्वसाधारण) या प्रवर्गातून संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने **सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८** या परीक्षेतून केलेल्या शिफारशीनुसार श्री.संग्राम शिवाजी पाटील यांचे "सहायक कक्ष अधिकारी" या पदावर **खुल्या (सर्वसाधारण)** या प्रवर्गातून खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात **वित्त विभागात** नियतवाटप करण्यात येत आहे.:-

(१) श्री. सं.शि.पाटील यांनी **दिनांक २७-१२-२०२१ पर्यंत** वित्त विभागात व्यक्तिश: उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. **सदरहू कालावधीत श्री.पाटील यांनी अस्थायी नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता, या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल**. तसेच श्री.पाटील यांनी विहित कालावधीत नियुक्ती स्विकारल्यास त्यांची सेवा ज्येष्ठता महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतूदीनुसार **श्री. पाटील हे ज्या दिनांकास सहायक कक्ष अधिकारी पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून सहायक कक्ष अधिकारी संवर्गात त्यांची सेवाज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.**

(२) लोकसेवा आयोगाकडे केलेल्या अर्जातील दाव्याची तपासणी / पडताळणी आयोगाने केलेली नसल्याने, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१८ साठी देण्यात आलेल्या जाहिरात क्रमांक : १४/२०१८, दिनांक २८.०२.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची दिनांक १.६.२०१८ रोजीच्या अर्हतेनुसार तसेच शैक्षणिक आणि अन्य अटींची दिनांक २७.०७.२०१८ रोजीच्या अर्हतेनुसार खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारांनी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे अत्यावश्यक आहे :-

(अ) वयोमर्यादा (दिनांक १.६.२०१८ रोजी)

(ब) अधिवास : मुख्य परीक्षेच्या जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे

(क) शैक्षणिक अर्हता: सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा महाराष्ट्र शासनाने मान्य केलेली समतुल्य अर्हता मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास किंवा तत्पूर्वी म्हणजेच दिनांक २७.०७.२०१८ रोजी किंवा तत्पूर्वी धारण करणे अत्यावश्यक आहे.

(ड) अंतर्वासिता (INTERNSHIP) निर्धारित केली असेल अशी पदवी धारण करणाऱ्या उमेदवारांनी अंतर्वासिता (INTERNSHIP) मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारणाच्या दिनांकापर्यंत (दिनांक २७ जुलै, २०१८ किंवा तत्पुर्वी) पूर्ण केली असेल तरच त्याला पदवीधर समजण्यात येईल.

(इ) प्रस्तुत परीक्षेच्या अधिसूचनेमधील परिच्छेद ६.४.४ नुसार मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक आहे. सदर बाब संबंधित उमेदवारांच्या मराठी भाषेच्या ज्ञानाबाबत त्यांच्या शालांत/उच्च माध्यमिक परीक्षेच्या प्रमाणपत्राआधारे खात्री करुन घेण्यात यावी.

(३) उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, शारीरिक दिव्यांग, जाती विषयक प्रमाणपत्र, इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक दिव्यांग असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, इत्यादीबाबतची मूळ प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी

उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल व तसे आयोगाला कळविण्यात येईल.

(४) सहायक कक्ष अधिकारी पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र क्र.मातंसं २०१२/प्र.क्र.२७०/३९, दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र/अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास **शासन अधिसूचना** क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.४६२/कार्या.१२, **दिनांक २८-०५-२०१८ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.**

(५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३.०८.२०१४ तसेच अन्य अद्ययावत शासन निर्णयामधील तरतूदीआधारे सदर सहायक कक्ष अधिकाऱ्यांची शिफारस करण्यात येत आहे. शासनाने यासंदर्भात वेळोवेळी केलेल्या सूचना विचारात घेता सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या पदाकरिता अमागास समांतर आरक्षित पदांसाठी शिफारसपात्र ठरलेले उमेदवार हे प्रत्यक्षात खुल्या (अराखीव) प्रवर्गातीलच उमेदवार आहेत याची त्यांच्या शाळा/ महाविद्यालय सोडल्याच्या दाखल्याआधारे तसेच अन्य तदनुषंगिक दस्तऐवजा आधारे नियुक्तीपूर्वी खात्री व पडताळणी करुनच त्यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती देण्यात यावी.

(६) सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८साठी उमेदवाराने मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची प्रत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपलब्ध करुन दिली आहेत. ते उमेदवारांच्या नियतवाटप केलेल्या विभागात उमेदवारांच्या प्रोफाईल सोबत. नियुक्ती प्राधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. उमेदवारांच्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत/अर्जातील फोटो यावरुन प्रत्यक्षात रुजू झालेला उमेदवार तोच आहे का, तसेच मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळाखपत्रावरुन अर्जातील उमेदवाराचा फोटो व स्वाक्षरी, ओळखपत्रातील फोटो व स्वाक्षरी त्याच उमेदवाराची आहे का, सादर केलेले **ओळखपत्र अधिकृत आहे का**, याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी करावी. तसेच उमेदवारांनी परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची वैधता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावी. तद्नंतरच संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती करण्यात यावी.

(७) साक्षांकन नमुना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, **नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांनी तो तेथून डाऊनलोड करावा.** सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने त्याचे नियतवाटप करण्यात आलेल्या विभाग/कार्यालयात हजर होताना सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : चापअ १००८/ प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **“प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल.”** असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक : चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(८) प्रस्तुत परीक्षेचा सुधारित अंतिम निकाल मा. सर्वोच्च न्यायालय येथे दाखल विशेष अनुमती याचिका क्र.१५७३७/२०१९ व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र. २०५३/२०१४ प्रकरणी समांतर आरक्षणाच्या मुद्यांसंदर्भात तसेच अन्य मुद्यांसंदर्भात विविध मा. न्यायालयात/मा. न्यायधिकरणात दाखल करण्यात आलेल्या न्यायिक प्रकरणातील अंतिम न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने/अधीन राहून जाहीर करण्यात आला आहे ही बाब विचारात घेऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८ मधून मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र. १०/२०२० प्रकरणी दिनांक २४ सप्टेंबर २०२१ रोजी दिलेले अंतिम आदेशास अनुसरुन श्री.सं.शि.पाटील या उमेदवारांची शिफारस केली आहे याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

(९) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरएन-२०१४/३४२/ प्र.क्र.५०/१४/१२-अ, दिनांक २७.५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४ब, दिनांक १३.५.२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत) प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे.

(१०) **सहायक कक्ष अधिकाऱ्यांची पदे ही मंत्रालयीन विभाग आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात असल्याचे परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. त्यामुळे अन्य जिल्ह्यामध्ये नियुक्ती देण्याची विनंती मान्य केली जाणार नाही व या संदर्भातील अर्जाची दखल घेतली जाणार नाही. तसेच, अन्य विभाग/कार्यालयात पुनर्वाटप करण्याबाबतच्या विनंतीचाही विचार करण्यात येणार नाही.**

(११) मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वत:च करावयाची असून त्यासाठी **मुदतवाढ दिली जाणार नाही.**

(१२) अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वत:च सोसावयाचा आहे.

(१३) उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा.

(१४) विभाग/कार्यालयाने नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे.

(१५) उक्त नमूद अटींची पूर्तता न झाल्यास उमेदवारांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०२१११२६१६५४१३९००७ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2021.11.26 17:01:38 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

कार्यालयांसाठी सहपत्रे :

१) उमेदवारांच्या नावाची यादी (उमेदवारांचा भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह)
२) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत
३) सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०१८ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत (अधिसूचना)
४) प्रतिवेदन नमूना (उमेदवार **दिनांक २७-१२-२०२१** पर्यंत आपल्या विभागात हजर न झाल्यास त्या उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय प्रतीसह कोणत्याही परिस्थितीत **दिनांक ३१-१२-२०२१** पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा.)

**प्रत :-**

१) अवर सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, यांना उपरोक्त सहपत्रांसह
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांना उपरोक्त सहपत्रांसह
३) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे)
४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १४-अ) (संग्रहार्थ)

## सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१८ मधून मंत्रालयीन विभागात करावयाचे उमेदवाराचे नियतवाटप

## सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र.एएससी १४१९/प्र.क्र.६५/१४-अ, दिनांक : २६ नोव्हेंबर, २०२१ सोबतचे (विवरणपत्र "अ")

| अ.क्र. | म.लो.आ. प्रतिक्षायादीतील शिफारस क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | नियतवाटप करण्यात आलेले मंत्रालयीन विभाग | उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | उमेदवाराचा ई-मेल आय.डी. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ----- | SANGRAM SHIVAJI PATIL | Unreserved | Open-General | अवर सचिव (आस्थापना), वित्त विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२६९, २२८२६८११ | ९५०३९२०५०१ | sanggipatil@gmail.com |

## उमेदवारांसाठी  रुजू अहवाल

| | | |
|---|---|---|
| उमेदवाराचे नांव | : | |
| उमेदवाराची जन्मतारीख | : | |
| उमेदवाराची  शैक्षणिक अर्हता | : | |
| उमेदवाराचा प्रतिक्षायादीतील शिफारस क्रमांक | : | |
| उमेदवाराचा स्वतःचा मूळ प्रवर्ग | : | |
| म.लो.आ. ने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | : | |
| उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | : | |
| उमेदवाराचा ई-मेल आय.डी. | : | |

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

महोदया,

मी खाली सही करणार श्री/श्रीमती ____________________________________________

नमूद करतो/करते की, आपले ज्ञापन क्रमांक एएससी १४१९/प्र.क्र.६५/१४-अ, दिनांक २६-११-२०२१ नुसार मी विभाग/कार्यालयात दिनांक ____________________ रोजी रुजू झालो/झाले. सदरहू माहिती आपणास उचित कार्यवाहीसाठी कळविण्यात येत आहे.

आपला/आपली विश्वासू,

(                                        )
उमेदवाराची सही व नांव

**टीप :**

(१) नियतवाटप केलेल्या विभाग/कार्यालयात हजर झाल्यानंतर उमेदवाराने तात्काळ वरील पत्र या विभागाकडे (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारली नाही असे समजून योग्य ती पुढील कार्यवाही केली जाईल याची त्यांनी नोंद घ्यावी

(२) ज्ञापनामध्ये उमेदवाराच्या नावापुढे दर्शविलेला क्रमांक हा त्याचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडील प्रतिक्षायादीतील शिफारस क्रमांक आहे. तो क्रमांक वर दर्शविलेल्या ठिकाणी नमूद करावा.

## नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन

क्रमांक : (विभाग/कार्यालयाचे नांव व पत्ता)
दिनांक :

प्रति,

अवर सचिव (कार्यासन १४-अ),
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
५ वा मजला, खोली क्रमांक ५५७-ए (विस्तारित)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रतिक्षायादीतील शिफारस केलेल्या उमेदवारांचे सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०१८
संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे क्र.एएससी १४१९/प्र.क्र.६५/१४-अ, दिनांक २६-११-२०२१ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

**(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

**(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्याच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज

(उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत) सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे (सही व पदनाम)

| अ.क्र. | नियतवाटप करण्यात आलेले मंत्रालयीन विभागाचा पत्ता |
|---|---|
| १ | अवर सचिव (आस्थापना), वित्त विभाग, ३ रा मजला, दालन क्र.३१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३२६९, २२८२६८११ |

L03/प

# महाराष्ट्र लोकसेवा आयोग
## Maharashtra Public Service Commission

मुख्य कार्यालय : ५½ ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी-२२७९५९०० फॅक्स:२२८८०५२४
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा माळा, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी :२२६७०२१०/१४८/२४८,२२१०२२२२. फॅक्स : २२६७३९१५

ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in

**महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब पूर्व परीक्षा - २०१८**

**क्रमांक : एडीव्ही-३११८/सीआर-७५/२०१७/तीन** **जाहिरात क्रमांक : १४/२०१८**

शासनाच्या विविध विभागांतर्गत खालील संवर्गातील एकूण ४४९ पदांच्या भरतीकरीता **महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब संयुक्त पूर्व परीक्षा - २०१८ रविवार, दिनांक १३ मे, २०१८** रोजी महाराष्ट्रातील ३७ जिल्हाकेंद्रांवर घेण्यात येईल :-

| **१.१ सामान्य प्रशासन विभाग** | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **सहायक कक्ष अधिकारी, गट-ब (अराजपत्रित) (एकूण २७ + १ # = २८ पदे)** | | | | | | | | | | | |
| प्रवर्ग | अ.जा. | अ.ज. | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | इ.मा.व. | वि.मा.प्र. | एकूण मागासवर्गीय | खुला | एकूण पदे |
| पदसंख्या | १ | १ | १ | १ | २ | -- | ६ | १ | १३ | १४+१# | २८ |
| **रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-** | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | १ | १ | १ | १ | १ | -- | ४ | १ | १० | १० | २० |
| (२) महिला | -- | -- | -- | -- | १ | -- | २ | -- | ३ | ४ | ७ |
| (३) खेळाडू | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | १ |
| **१.२ वित्त विभाग** | | | | | | | | | | | |
| **राज्य कर निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (एकूण ३४ पदे)** | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | १० | ३ | -- | १ | १ | -- | १ | १ | १७ | १७ | ३४ |
| **रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-** | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | ६ | २ | -- | १ | १ | -- | १ | १ | १२ | ११ | २३ |
| (२) महिला | ३ | १ | -- | -- | -- | -- | -- | -- | ४ | ५ | ९ |
| (३) खेळाडू | १ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | १ | २ |
| (४) विकलांग | एकूण पदे ६ - (१)अंधत्व किंवा क्षीणदृष्टी - २ पदे (२) श्रवणशक्तीतील दोष - २ पदे (३) चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदुचा अर्धांगवायू - २ पदे | | | | | | | | | | |
| **१.३ गृह विभाग** | | | | | | | | | | | |
| **पोलीस उप निरीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (एकूण ३८७ पदे)** | | | | | | | | | | | |
| पदसंख्या | ४७ | २४ | १० | १० | १३ | ८ | ७३ | ८ | १९३ | १९४ | ३८७ |
| **रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-** | | | | | | | | | | | |
| (१)सर्वसाधारण | ३१ | १६ | ६ | ६ | ८ | ६ | ४७ | ६ | १२६ | १२६ | २५२ |
| (२) महिला | १४ | ७ | ३ | ३ | ४ | २ | २२ | २ | ५७ | ५८ | ११५ |
| (३) खेळाडू | २ | १ | १ | १ | १ | -- | ४ | -- | १० | १० | २० |
| # महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील पदे | | | | | | | | | | | |

२. जाहिरातीत नमूद केलेल्या अटींची पुर्तता करणा-या उमेदवारांकडून ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागविण्यात येत आहेत.

**३.** संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे वेगवेगळया संवर्गाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांकरीता स्वतंत्र मुख्य परीक्षा खालील दिनांकास किंवा त्यानंतर आयोजित होण्याची शक्यता आहे :-

| अ.क्र. | परीक्षा | वार व दिनांक |
|---|---|---|
| | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०१८ संयुक्त पेपर क्रमांक १ | रविवार, दिनांक २६ ऑगस्ट, २०१८ |
| १ | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०१८ पेपर क्रमांक २<br>पोलीस उप निरीक्षक | रविवार, दिनांक २ सप्टेंबर, २०१८ |
| २ | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०१८ पेपर क्रमांक २<br>राज्य कर निरीक्षक | रविवार, दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ |
| ३ | महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षा - २०१८ पेपर क्रमांक २<br>सहायक कक्ष अधिकारी | शनिवार दिनांक ६ ऑक्टोबर, २०१८ |

**४.** वर नमूद तीन संवर्गासाठी आयोजित महाराष्ट्र दुय्यम सेवा मुख्य परीक्षेचा पेपर क्रमांक १ हा सामाईक राहील. तसेच सदर पेपरची परीक्षा एकाच दिवशी एकत्र घेण्यात येईल. मुख्य परीक्षेचा पेपर क्रमांक २ मात्र संबंधित संवर्गाची/पदाची कर्तव्ये व जबाबदा-या आणि अभ्यासक्रम लक्षात घेवून स्वतंत्र असेल.

**५. पदसंख्या व आरक्षणासंदर्भात सर्वसाधारण तरतुदी :-**

**५.१** वर नमूद केलेल्या संवर्गातील पदसंख्येत व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल/वाढ होण्याची शक्यता आहे. पदसंख्या व आरक्षणात बदल झाल्यास त्याचा समावेश मुख्य परीक्षेच्या अधिसूचनेमध्ये करण्यात येईल.

**५.२ पूर्व परीक्षेचा निकाल अंतिम करेपर्यंतच्या कालावधीपर्यंत शासनाकडून प्राप्त होणारी मागणीपत्रे पूर्व परीक्षेच्या निकालासाठी विचारात घेण्यात येतील व अशा मागणीपत्रांचा तपशील मुख्य परीक्षेच्या अधिसूचनेद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल.**

**५.३** महिला व खेळाडूंसाठीचे आरक्षण शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

५.४ महिलांसाठी आरक्षित पदांकरीता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अ.जा. व अ.ज. वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

५.५ वि.जा (अ), भ.ज. (ब), भ.ज. (क) व भ.ज. (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित वर्गवारीतील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गातील उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

५.६ शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६ तसेच शासन शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासंदर्भात तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

५.७ प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवारांच्या बाबतीत त्यांची क्रीडा विषयक प्रमाणपत्रे योग्य दर्जाची असल्याबाबत व तो उमेदवार खेळाडू प्रवर्गातील आरक्षित पदासाठी पात्र ठरतो याबाबत, आयोगास अर्ज सादर करण्यापूर्वीच, सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्रमाणपत्र प्राप्त केलेले असणे आवश्यक आहे.

५.८ संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय किंवा सक्षम प्राधिका-याकडे प्रमाणपत्रे सादर करताना पात्र खेळाडू उमेदवाराने प्राविण्य प्राप्त खेळाडू आरक्षणासाठी त्यांना पात्र ठरवणारी आपली खेळाडू विषयक **सर्व प्रमाणपत्रे एकाच वेळी** सादर करणे आवश्यक आहे..

५.९ क्रीडा प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत व खेळाडू कोणत्या संवर्गासाठी पात्र ठरतो याविषयी अर्ज सादर करण्यापूर्वीच्या दिनांकाचे सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्रमाणपत्र सादर केले तर त्याला खेळाडू प्रवर्गाच्या आरक्षणाचा लाभ घेता येईल.

५.१० शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : कअस १३१५/प्र.क्र.१२०/१४-ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण १०१२/प्र.क्र.२१३/वि.प्र. - ४, दिनांक ११ मार्च, २०१६ नुसार अंधत्व किंवा क्षीणदृष्टी, श्रवणशक्तीतील दोष व चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू या प्रकारच्या पात्रतेचे निकष धारण करणारे विकलांग उमेदवार गुणवत्तेनुसार सहायक कक्ष अधिकारी व राज्य कर निरीक्षक पदाकरीता शिफारशीसाठी पात्र असतील.

५.११ शासन अधिसूचना, गृह विभाग क्रमांक उसप्रे-०३९८/सीआर-४५७/भाग-२/पोल-५ अ, दिनांक १५ ऑक्टोबर, २००३ नुसार विकलांग उमेदवार पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता पात्र नाहीत.

५.१२ विकलांग उमेदवारांची पात्रता शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

५.१३ विकलांगांसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

५.१४ विकलांगासाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता विकलांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

५.१५ विकलांग व्यक्तींसाठी असलेल्या वयोमर्यादेचा अथवा इतर कोणत्याही प्रकारचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्रकि-२०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१२ मधील आदेशानुसार SADM या नविन संगणक प्रणालीदवारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील विकलांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे.

५.१६ समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

५.१७ मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्रमांक २०५३/२०१४ प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदभरतीची कार्यवाही करण्यात येईल.

५.१८ परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर, मागासवर्गीयांसाठी विहित केलेली वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास अशा उमेदवारांची अमागास (सर्वसाधारण) पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

५.१९ अमागास उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक निकषांसदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा (मागासवर्गीय उमेदवारांसह) अमागास सर्वसाधारण पदावरील शिफारशींकरीता विचार होत असल्याने, सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी, अर्जामध्ये त्यांच्या मूळ आरक्षित प्रवर्गासंदर्भातील माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

५.२० राज्य कर निरीक्षक व पोलीस उपनिरीक्षक भरतीकरीता "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" तसेच तद्नंतर यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

## ६. विकलांग उमेदवार :- लेखनिक व अनुग्रह कालावधीबाबत

६.१ फक्त दृष्टीहीन, अल्पदृष्टी, अस्थिव्यंग, सेरेब्रल पाल्सी आणि डिस्लेक्सियाने बाधित व किमान ४०% कायमस्वरुपी विकलांगत्व असलेल्या पात्र उमेदवारांना, ते लिहिण्यासाठी सक्षम नसल्यास, परीक्षा प्रयोजनार्थ गुणवत्तेनुसार लेखनिकाची मदत घेता येईल व अनुग्रह कालावधी (Compensatory Time) अनुज्ञेय राहील.

६.२ प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी उत्तरे लिहिण्यासाठी सक्षम नसलेल्या, पात्र विकलांग उमेदवारांना, लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची आवश्यकता असल्यास संबंधित उमेदवाराने ऑनलाईन पध्दतीने आयोगास अर्ज सादर केल्याच्या दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत आवश्यक प्रमाणपत्र/कागदपत्रांसह विहित नमुन्यामध्ये आयोगाकडे लेखी विनंती करणे आवश्यक आहे.

६.३ लेखनिकाची व्यवस्था उमेदवारांकडून स्वत: केली जाणार आहे की आयोगाच्या कार्यालयामार्फत लेखनिकाची व्यवस्था करावी लागणार आहे याचा स्पष्ट उल्लेख जाहिरातीस अनुसरुन ऑनलाईन पध्दतीने केलेल्या अर्जामध्ये असल्यासच विहित नमुन्याद्वारे प्राप्त लेखी विनंतीचा विचार केला जाईल.

६.४ अर्जामध्ये मागणी केली नसल्यास तसेच आयोगाची विहित पध्दतीने पूर्व परवानगी घेतली नसल्यास ऐनवेळी लेखनिकाची मदत घेता येणार नाही अथवा अनुग्रह कालावधी अनुज्ञेय असणार नाही.

६.५ विकलांग व्यक्तींना लेखनिक पुरविण्याबाबत व अनुग्रह कालावधी अनुज्ञेय ठरविण्याबाबत मार्गदर्शक सूचना, विविध अर्जाचे नमुने, विशेष सूचना, संबंधित शासन आदेश इत्यादी बाबी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील विकलांग व्यक्ती' या सदरामध्ये उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

**७. वेतनश्रेणी** :- रूपये ९,३००-३४,८०० (ग्रेड पे- ४,३००) अधिक नियमांनुसार भत्ते.

**८. पात्रता** :-

**८.१** भारतीय नागरिकत्व

**८.२ वयोमर्यादा** :-

| अ. क्र. | संवर्ग | वयोमर्यादा गणण्याचा दिनांक | वय | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | किमान | कमाल | | प्राविण्य प्राप्त खेळाडू | | माजी सैनिक, आणिबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी | | विकलांग उमेदवार |
| | | | अमागास / मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | १ जून २०१८ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४८ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| २ | राज्य कर निरीक्षक | १ मे २०१८ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४८ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | १ जून २०१८ | १९ | ३१ | ३४ | ३६ | ३९ | ३६ | ३९ | अपात्र |

**८.३** विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**८.४ शैक्षणिक अर्हता** :-

**८.४.१** सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य असणारी शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता.

**८.४.२** पदवी परीक्षेस बसलेले उमेदवार प्रस्तुत संयुक्त पूर्व परीक्षेस तात्पुरते पात्र असतील. परंतु संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे संबंधित संवर्गाकरीता घेण्यात येणा-या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांनी संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**८.४.३** अंतर्वासिता (Internship) किंवा कार्यशाळेतील कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवीधारकाने ही अट मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारण्याच्या विहित अंतिम दिनांकापर्यंत पूर्ण केली असली पाहीजे.

**८.४.४** मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.

**८.४.५ पोलीस उपनिरीक्षक पदासाठी विकल्प नमूद करणा-या उमेदवारांकडे उपरोक्त अर्हतेसोबत खालीलप्रमाणे किमान शारीरिक अर्हता असणे आवश्यक आहे :-**

| पुरुष | महिला |
|---|---|
| (१) उंची - १६५ सें. मी. (अनवाणी) (कमीत कमी)<br>(२) छाती - न फुगविता ७९ से.मी.<br>फुगविण्याची क्षमता किमान ५ से.मी. आवश्यक | उंची - १५७ सें.मी. (अनवाणी) (कमीत कमी) |

**८.४.६** पोलीस उपनिरीक्षक पदावरील नियुक्तीकरीता शिफारस झालेल्या उमेदवारांची शारिरिक मोजमापे नियुक्ती करण्यापूर्वी शासनामार्फत सक्षम प्राधिका-याकडून तपासून घेण्यात येतील. वरीलप्रमाणे विहित शारीरिक पात्रता नसल्यास संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी अपात्र ठरेल.

**९. सेवाप्रवेशोत्तर शर्ती** :-

**९.१** नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**९.१.१** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**९.१.२** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**९.१.३** महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची प्रमाणपत्र परीक्षा

**१०. परीक्षेचे टप्पे** -

**१०.१** प्रस्तुत भरती प्रक्रिया खालील टप्प्यामध्ये राबविण्यात येईल :-

| अ.क्र. | संवर्ग | टप्पे | संयुक्त पूर्व परीक्षेचे गुण | मुख्य परीक्षेचे गुण | शारीरिक चाचणीचे गुण | मुलाखतीचे गुण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | संयुक्त पूर्व परीक्षा व स्वतंत्र मुख्य परीक्षा | १०० | २०० | -- | -- |
| २ | राज्य कर निरीक्षक | | | | | |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | संयुक्त पूर्व परीक्षा, स्वतंत्र मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी व मुलाखत | | | १०० | ४० |

**१०.२ संयुक्त पूर्व परीक्षेच्या जाहिरातीस अनुसरुन अर्ज करणा-या उमेदवारांना, ते वरीलपैकी एक, दोन किंवा तीनही संवर्गासाठी बसू इच्छितात किंवा कसे याबाबत विकल्प (Option) द्यावा लागेल.**

**१०.३ संबंधित संवर्गाकरीता उमेदवाराने दिलेला/ले विकल्प हा/हे संबंधीत संवर्ग भरतीकरीता अर्ज समजण्यात येईल/येतील.**

**१०.४** संयुक्त पूर्व परीक्षेस अर्ज करताना दिलेला विकल्प तसेच, भरावयाच्या पदसंख्येच्या आधारे, संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेसाठी पात्र करावयाच्या उमेदवारांची संख्या निश्चित करुन, सामाईक पूर्व परीक्षेच्या आधारे तीनही संवर्गाकरीता पूर्व परीक्षेचा स्वतंत्र निकाल जाहीर करण्यात येईल.

**१०.५** संयुक्त पूर्व परीक्षेच्या निकालाच्या आधारे संबंधित संवर्गाकरीता घेण्यात येणा-या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांची संबंधित संवर्गाच्या परीक्षा योजना व अभ्यासक्रमाच्या आधारे स्वतंत्र मुख्य परीक्षा घेण्यात येईल. संबंधित संवर्गाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशाकरीता पात्र ठरलेल्या उमेदवारांनी प्रत्येक संवर्गाकरीता मुख्य परीक्षेसाठी स्वतंत्र अर्ज करणे आवश्यक राहील.

१०.६ मुख्य परीक्षेमध्ये प्राप्त गुणांच्या आधारे संबंधित संवर्गाच्या परीक्षा योजनेनुसार, निवड प्रक्रिया पूर्ण करण्यात येईल. पूर्व परीक्षा केवळ मुख्य परीक्षेसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यासाठी घेतली जात असल्याने पूर्व परीक्षेतील गुण निवडीसाठी विचारात घेतले जाणार नाहीत.

१०.७ पोलीस उप निरीक्षक संवर्गाकरीता शारीरिक चाचणीच्या निकालाच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच मुलाखतीसाठी बोलविण्यात येईल.

१०.८ मुलाखत अथवा कागदपत्रे पडताळणीसाठी आमंत्रित केल्यानंतर पात्रतेसंदर्भातील सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्रे सादर करणे आवश्यक आहे. पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्या अथवा प्रमाणपत्र पडताळणीच्यावेळी सादर न केल्यास मुलाखत घेतली जाणार नाही. तसेच, शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.

**११. शुल्क रुपये :** ९.१ :- अमागास - ३७४/- ९.२ :- मागासवर्गीय - २७४/-

**१२. अर्ज करण्याची पध्दत :-**

१२.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील.

१२.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ ते दिनांक २० मार्च, २०१८** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

१२.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

१२.४ आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

१२.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरीता अपात्र ठरविण्यात येईल.

१२.६ आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

१२.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरीता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

१२.७.१ शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील माझे खाते या लिंक वर क्लिक करावे.

१२.७.२ "माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर "माझे ॲप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

१२.७.३ 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. **'Unpaid' लिहिलेल्या** पद/परीक्षेसमोर **'Pay Now'** अशी लिंक उपलब्ध असेल.

१२.७.४ **" Pay Now"** या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील :- **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

१२.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

१२.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

१२.७.७ चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

१२.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

१२.७.९ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक २० मार्च, २०१८** रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

१२.७.१० चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक २१ मार्च, २०१८** पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

१२.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

**१२.८ केंद्र निवड :-**

१२.८.१ परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला परीक्षा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे. त्याकरीता "माझे खाते" मधील संबंधित परीक्षेची निवड करावी. त्यानंतर "केंद्र निवडा" या पर्यायावर क्लिक करावे. सदर पर्यायांतर्गत निवडलेल्या केंद्राची क्षमता दर्शविली जाईल. केंद्राच्या क्षमतेइतक्या अर्ज तत्पूर्वी प्राप्त झाले असतील, तर सदर केंद्र उपलब्ध नसून, दुसरे केंद्र निवडावे, असा संदेश प्राप्त होईल. केंद्राची निवड केल्यानंतर सेव्ह बटनावर क्लिक केल्यास केंद्र निवडीची व अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होईल.

१२.८.२ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडलेले उमेदवार शुल्क भरल्याच्या दिनांकाच्या दुस-या दिवशी केंद्र निवडीची प्रक्रिया करु शकतील. दुसरा दिवस कार्यालयीन सुटटी अथवा रविवारचा असेल, तर सदर कार्यवाही त्यानंतर लगेच येणा-या पुढील कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी करता येईल.

१२.८.३ वरीलप्रमाणे केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यामधील नमूद जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

१२.८.४ केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत मान्य करण्यात येणार नाही.

**१३. प्रवेश प्रमाणपत्र :-**

१३.१ प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे **७** दिवस अगोदर प्रवेशप्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

१३.२ परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

१३.३ परीक्षेस येतेवेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान **कोणतीही दोन** मूळ **ओळखपत्रे** व **त्याच्या** छायांकित **प्रती** सोबत आणणे अनिवार्य आहे.

